क्र.उसप-१३११/प्र.क्र.७०/११/१४ ५५।७

सामान्य प्रशासन विभाग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: १९ मे, २०११

## आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (१), ४ (२), व ४ (३) अनुसार मंत्रालयीन संवर्गातील खाली नमूद केलेल्या सह/उप सचिवांची बदली करण्यात येत असून त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या विभागामध्ये त्यांची पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | नाव | सध्याचा विभाग | बदलीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती ज्यो.सु.पोतदार सह सचिव | जलसंपदा विभाग | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| २ | श्री.वि.र.दहिफळे, उप सचिव | सा.बां. विभाग | जलसंपदा विभाग |
| ३ | श्री.अ.बा.घरत, उप सचिव | नगर विकास विभाग | सामान्य प्रशासन विभाग |

२. वर नमूद केलेल्या अधिका-यांच्या बदल्यांची तात्काळ अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने पुढील सूचनांचे सर्व संबंधित विभागांनी कटाक्षाने पालन करावे.

अ) बदली झालेल्या अधिका-यांच्या संबंधित विभागाने पर्यायी अधिकारी हजर होण्याची प्रतिक्षा न करता त्या विभागातील अधिका-यांना विनाविलंब कार्यमुक्त करावे.

ब) अधिकारी बदलीच्या आदेशानुसार अन्य विभागातून कार्यमुक्त होवून रुजू होण्यासाठी विभागात आल्यानंतर त्यांना विनाविलंब हजर करुन घ्यावे. एखादया अधिका-याला रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाकाळ मंजूर करण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित विभागाला जबाबदार धरण्यात येईल.

क) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिका-यांने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

३. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०५१८१३१६४२००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(के.पी.बक्षी)

प्रधान सचिव(सेवा), महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

प्रधान सचिव (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई,

अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, - जलसंपदा विभाग, सा.बां. विभाग, सा. प्र. विभाग, नगर विकास विभाग.

सह/उप सचिव (आस्थापना), - जलसंपदा विभाग, सा.बां. विभाग, सा. प्र. विभाग, नगर विकास विभाग.

संबंधित अधिकारी.

निवडनस्ती कार्या.१४